**केंद्र पुरस्कृत योजना सन २०२०-२०२१**
**"व्याघ्र प्रकल्प" योजनेंतर्गत ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्पाकरीता निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०८.२०/प्र. क्र. ११३/फ-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १३ नोव्हेंबर, २०२०.

**वाचा :-**

१. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि. १६ एप्रिल, २०२०.
२. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि. ०४ मे, २०२०.
३. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि. १४ मे, २०२०.
४. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. संकिर्ण१०१८/प्र.क्र. ४६/अर्थोपाय, दि. १८ मे, २०२०.
५. वित्त विभाग, परिपत्रक क्र.संकीर्ण-२०२०/प्र.क्र.६७/कोषा-प्रशा-५, दि. २६ मे, २०२०.
६. केंद्रीय पर्यावरण, वन आणि हवामान बदल, मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र. ४-१(११)/२०२०-पीटी, दि. २८.०७.२०२०.
७. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक डब्ल्यूएलपी-०६.२०/प्र.क्र.९१/फ-१, दि. ०२.०९.२०२०
८. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपुर यांचे पत्र क्र. कक्ष-१/सी/यो/TATR/प्र. क्र. १५/२०२०-२०२१, दि. १०.०८.२०२०.
९. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपुर यांचे पत्र क्र. कक्ष-१/सी/यो/TATR/प्र. क्र. १२/३४/२०२०-२०२१, दि. २४.०९.२०२०.

**प्रस्तावना :-**

"व्याघ्र प्रकल्प" योजनेंतर्गत पूर्वी केंद्र शासनाकडून अनावर्ती बाबींकरीता २४०६ १२४३ या लेखाशिर्षातंर्गत १००% केंद्र अनुदान उपलब्ध करुन दिले जात होते. तथापि सन २०१६-१७ मध्ये सदर योजनेच्या हिस्सा पध्दतीमध्ये बदल करण्यात आल्याचे केंद्रीय पर्यावरण, वन आणि हवामान बदल मंत्रायल, नवी दिल्ली यांनी सूचविले. त्यानुसार सन २०१६-१७ मध्ये व्याघ्र प्रकल्प या योजनेकरीता सर्वसाधारण घटकाअंतर्गत अनावर्ती बाबींकरीता केंद्र हिस्सा ६०% (२४०६ १२४३) हे लेखाशिर्ष तर त्या अनुरुप राज्य हिस्सा ४०% (२४०६ ए१०२) व आवर्ती बाबींकरीता केंद्र हिस्सा ५०% (२४०६ ए१२२) हे लेखाशिर्ष तर त्या अनुरुप राज्य हिस्सा ५०% (२४०६ ए१३१) या लेखाशिर्षाचा वापर करण्यात येत आहे.

२. सन २०२०-२०२१ या आर्थिक वर्षाकरिता केंद्र पुरस्कृत "व्याघ्र प्रकल्प" योजनेंतर्गत ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्पाकरीता केंद्र शासनाने संदर्भ क्रमांक ६ च्या पत्रान्वये सर्वसाधारण घटक, अनुसुचित जाती उपयोजना व आदिवासी क्षेत्र उपयोजना अंतर्गत आवर्ती व अनावर्ती बाबींकरीता रु.

२०७१.८८ लक्षचे कार्यबाबीस मंजूरी प्रदान केली आहे. त्या अनुषंगाने केंद्र शासनाचा **(सर्वसाधारण घटक, अनुसुचित जाती उपयोजना व आदिवासी क्षेत्र उपयोजना)** अनावर्ती + आवर्ती बाबींचा हिस्सा (६०% + ५०%) प्रथम हप्ता म्हणून रु. ५६२.२६ लक्ष तर त्या अनुरुप राज्य शासनाचा **(सर्वसाधारण घटक, अनुसुचित जाती उपयोजना व आदिवासी क्षेत्र उपयोजना)** अनावर्ती + आवर्ती बाबींचा हिस्सा (४०% + ५०%) प्रथम हप्ता म्हणून रु. ४७३.६८ लक्ष असे एकूण रु. १०३५.९४ लक्ष निधी वितरीत करण्यास मंजूरी प्रदान केली आहे.

**<u>शासन निर्णय :-</u>**

सदर शासन निर्णयान्वये **रु. ५८४.८० लक्ष** निधी संदर्भ क्रमांक ६ च्या पत्रान्वये केंद्रीय पर्यावरण, वन आणि हवामान बदल, मंत्रालय, नवी दिल्ली यांनी मान्यता दिलेल्या कार्यबाबींवर खर्च करण्यास खालील अटींच्या अधीन राहून शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

अ) “व्याघ्र प्रकल्प” या केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्पाच्या विकासात्मक कामांसाठी होणारा **I)** केंद्र हिस्सा रु. १७६.६४ लक्ष लेखाशिर्ष क्र. २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ०२ पर्यावरणीय वनीकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीवन संरक्षण, (००) (०४) व्याघ्र प्रकल्प (अनावर्ती खर्च) (६० टक्के केंद्र हिस्सा) (कार्यक्रम) (२४०६ १२४३) **II)** त्या अनुरुप राज्य हिस्सा रु. ०.०० लक्ष (वित्त विभागाच्या पूर्व परवानगीने विशेष व्याघ्र संरक्षण दल (STPF) च्या वेतनावर होणाऱ्या खर्चाकरीता संदर्भ क्रमांक ७ च्या शासन रु. १४८.२२ लक्ष निधी अन्वये वितरीत करण्यात आला असल्याने सदर लेखाशिर्षांतर्गत रु. ००.०० लक्ष दर्शविण्यात आले आहेत.) लेखाशिर्ष क्र. २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ०२ पर्यावरणीय वनीकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीवन संरक्षण, (००)(२१) व्याघ्र प्रकल्प (अनावर्ती खर्च) (४० टक्के राज्य हिस्सा) (कार्यक्रम) (२४०६ ए१०२) **III)** केंद्र हिस्सा रु. २०४.०८ लक्ष लेखाशिर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ०२ पर्यावरणीय वनीकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीवन संरक्षण, (००)(२३) व्याघ्र प्रकल्प (आवर्ती खर्च) (५० टक्के केंद्र हिस्सा) (कार्यक्रम) (२४०६ ए१२२) **IV)** त्या अनुरुप राज्य हिस्सा रु. २०४.०८ लक्ष २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ०२ पर्यावरणीय वनीकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीवन संरक्षण, (००)(२४) व्याघ्र प्रकल्प (आवर्ती खर्च) (५० टक्के राज्य हिस्सा) (कार्यक्रम) (२४०६ ए१३१) च्या सन २०२०-२०२१ मध्ये अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे उपलब्ध होणा-या अनुदानातून खर्च करण्यात यावा.

आ) सदर शासन निर्णयान्वये वितरीत केलेला निधी केंद्र शासनाने संदर्भीय पत्रान्वये मान्यता दिलेल्या तपशीलवार कार्यबाबींवर व सदर कामांना सक्षम प्राधिका-याची प्रशासकीय व तांत्रिक मान्यता असल्याखेरीज रक्कम खर्ची टाकण्यात येऊ नये.

इ) वितरीत केलेला निधी केंद्र शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेत विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच केंद्र शासनाने प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

ई) प्रस्तावित असलेल्या मोठया बांधकामासाठी शासनाने दिलेल्या सूचना आणि विहीत केलेली कार्यपद्धती अनुसरण्याची जबाबदारी संबंधीत नियंत्रक/अंमलबजावणी अधिकारी यांची राहील.

उ) वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शन सूचनांचे व वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दिनांक : १६.०४.२०२०, वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दिनांक : ०४.०५.२०२०, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि. १४ मे, २०२०, वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. संकिर्ण१०१८/प्र.क्र. ४६/अर्थोपाय, दिनांक १८.०५.२०२० व वित्त विभाग, परिपत्रक क्रमांक : संकीर्ण-२०२०/प्र.क्र.६७/कोषा-प्रशा-५, दिनांक : २६.०५.२०२० चे काटेकोर पालन करावे.

२. सदर शासन निर्णय नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक १८८/१४७५, दिनांक ०८.१०.२०२०, वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक २७३/व्यय-१०, दिनांक २०.१०.२०२० व अनौपचारिक संदर्भ क्रमांक २४९/अर्थोपाय, दिनांक २०.१०.२०२० ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०१११३१६३५५३८५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SIDDESH TUKARAM SAWARDEKAR

Digitally signed by SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7dc40890d791d1b1e6bae88da52eabb63f1f3ab6258c7e318f8c37f3ae7c36f2, serialNumber=5712ce2d7a095c22e97ebb8f03c668b12eba1db0dd8e284883b7bd7fa74da65d, cn=SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
Date: 2020.11.13 16:37:52 +05'30'

**( सिध्देश सावर्डेकर )**
विशेष कार्य अधिकारी
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक ( अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पूर्व, नागपूर.

५. वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्प, चंद्रपूर.

६. महालेखापाल-१/२ (लेखापरीक्षण /लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.

७. फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२ (निवडनस्ती).